स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गातील कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती/सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेतील पहिला लाभ व दुसरा लाभ देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः पदनि-२०१२/प्र.क्र.२२९/आस्था-१०
बांधकाम भवन,२५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
तारीख: २८ जुलै,२०१४

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.नियुक्ती-१००३/ प्र.क्र.२९५१/१४, दि.२०-५-१९९९.
२) शासन निर्णय क्रमांक: ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.स्थाअस-२००२/प्र.क्र.४२१/ आस्था-९, दि. ५-८-२००३.
३) शासन पत्र क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.पदनि-२६०५/प्र.क्र.७५०/ आस्था-१०, दि. २२-६-२००७.
४) शासन पत्र क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.पदनि-२६०५/प्र.क्र.७५०/ आस्था-१०, दि.२९-९-२००८.
५) शासन परिपत्रक क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक-पदनि-३९०८/ प्र.क्र.५८६/आस्था-१०, दि.२३-८-२०१०.

शासन परिपत्रक -

"स्थापत्य अभियांत्रिकी सहायक" हा नवीन संवर्ग १) सहायक कनिष्ठ अभियंता, २) मेस्त्री ग्रेड-१, ३) मेस्त्री ग्रेड-२, ४) रोड कारकून, ५) मस्टर क्लार्क, ६) समयपाल ७) अनुरेखक या संवर्गाचे, एकत्रिकरण करुन शासनाच्या संदर्भाधिन अ.क्र.१ येथील शासन निर्णयाव्दारे निर्माण करण्यात आला आहे. सदर ७संवर्गातील कर्मचाऱ्यांचे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गात समावेशन करण्याबाबत दि.२०-५-१९९९ च्या शासन निर्णयाव्दारे कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे. तसेच सदर संवर्गातील कर्मचाऱ्यांचे "स्थापत्य अभियांत्रिकी सहायक" संवर्गात टप्प्याटप्प्याने समावेशन करण्याकरिता वेळोवेळी शासनाने आदेश दिलेले

आहेत. अशाप्रकारे विहित कार्यपध्दती पूर्ण करुन ज्या कर्मचाऱ्यांचे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गात समावेशन झाले आहे त्या कर्मचाऱ्यांना शासनाची कालबध्द पदोन्नती सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत कनिष्ठ अभियंता पदाची वेतनश्रेणी देण्यासंदर्भात वर नमूद केलेल्या अ.क्र. ३ येथील दि. २२-६-२००७ च्या शासन पत्राव्दारे मंजूरी दिलेली आहे. तसेच, यासंदर्भात शासनाच्या वर नमूद केलेल्या अ.क्र. ४ येथील दि.२९-९-२००८च्या पत्राव्दारे कालबध्द पदोन्नती/सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करतांना कोणत्या बाबी विचारात घेण्यात याव्यात याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत. तसेच, संदर्भाधिन अ.क्र.५ येथील दि.२३-८-२०१० च्या शासन परिपत्रकाव्दारे स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांना कनिष्ठ अभियंता पदाची पदोन्नती अथवा कालबध्द पदोन्नती देतांना वयाची ४५ वर्षे पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्यांना कनिष्ठ अभियंता पदाची व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात आली आहे.

२. काही जिल्हा परिषदांकडून स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक संवर्गातील कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती/ आश्वासित प्रगती योजनेंच्या लाभाची मंजुरी देतांना वा त्याबाबतची अंमलबजावणी करण्यासंदर्भात प्रकरणपरत्वे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.८-६-१९९५, शासन निर्णय, वित्त विभाग, दि. २०-७-२००१ मधील तरतुदीनुसार कार्यवाही झाली नसून, चुकीची कार्यवाही झाल्याचे दिसून आले आहे. तसेच, काही जिल्हा परिषदांनी यासंदर्भात विविध मुद्यांवर शासनाचे मार्गदर्शन मागितले आहे. यामध्ये प्रामुख्याने खालील बाबींचा समावेश आहे:-

(१) सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांना पहिल्या लाभापासून १२ वर्षाची नियमित सेवा विचारात घेऊन कोणत्या पदाची वेतनश्रेणी दुसरा लाभ म्हणून मंजूर करावी.

(२) स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या पदावर समायोजन झालेले नसतांना त्यांना त्यापूर्वीच कनिष्ठ अभियंता पदाची वेतनश्रेणी देय होईल काय,

(३) सहायक कनिष्ठ अभियंता, मेस्त्री ग्रेड-१, मेस्त्री ग्रेड-२, रोड कारकून, मस्टर क्लार्क, समयपाल, अनुरेखक या ७ संवर्गातील कर्मचाऱ्यांना त्यांच्या मूळ पदावर केवळ १२ वर्ष पूर्ण झाली म्हणून कनिष्ठ अभियंता पदाची वेतनश्रेणी देय होईल काय, किंवा स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या पदावर समावेशन झाल्यानंतर १२ वर्षानी देय होईल.

(४) जे कर्मचारी व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण झालेले नाहीत त्यांना वयाची ४५ वर्षे पूर्ण झाल्यानंतर व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाल्यानंतरच कालबध्द पदोन्नती/सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ अनुज्ञेय ठरेल किंवा दि.२२-६-२००७ च्या पत्रातील सूचनांनुसार सरसकट १२ वर्षाची सेवा विचारात घेऊन कनिष्ठ अभियंता पदाची वेतन श्रेणी देय ठरेल.

३. जिल्हा परिषदांनी उपस्थित केलेले मुद्दे विचारात घेऊन स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गातील कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती/सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देतांना खालीलप्रमाणे कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी:-

(१) स्थापत्य अभियांत्रिकी सहायक हा संवर्ग शासनाच्या दि.२०-५-१९९९ च्या शासन निणर्याव्दारे अस्तित्वात आलेला आहे. त्यामुळे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाच्या अनुषंगाने देय ठरणारे कोणतेही लाभ सहायक कनिष्ठ अभियंता, मेस्त्री ग्रेड-१, मेस्त्री ग्रेड-२, रोड कारकून, मस्टर क्लर्क, समयपाल व अनुरेखक या संवर्गातील कर्मचाऱ्यांना दि.२०-५-१९९९ पूर्वी अनुज्ञेय ठरणार नाहीत. त्यांना, त्यांचे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गात समावेशन होईपर्यंत त्यांच्या पूर्वीच्या संवर्गानुसारच ते स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदाच्या वेतनश्रेणीशी समकक्ष असणाऱ्या वेतनश्रेणीतील मूळच्या पदावर रुपांतरित अस्थायी आस्थापना (CRT) वर ज्या तारखेस आले असतील त्या तारखेपासून शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.८-६-१९९५, शासन निर्णय, वित्त विभाग, दि.२०-७-२००१ नुसार आश्वासित प्रगती योजनेच्या लाभास अन्य शर्तींच्या पूर्ततेच्या अधिन राहून संबंधित कर्मचाऱ्यांना लाभ अनुज्ञेय राहतील.

(२) सहायक कनिष्ठ अभियंता, मेस्त्री ग्रेड-१, मेस्त्री ग्रेड-२, रोड कारकून, मस्टर क्लर्क, समयपाल व अनुरेखक या ७ संवर्गातील जे कर्मचारी दि.२०-५-१९९९ पूर्वी सेवानिवृत्त झालेले आहेत त्यांचे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गात समावेशन होण्याचा प्रश्न उद्भवत नसल्याने अशा कर्मचाऱ्यांना स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाचे कोणतेही लाभ अनुज्ञेय राहाणार नाहीत. त्यांना त्यांच्या मूळ संवर्गानुसार यथास्थिती शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.८-६-१९९५, शासन निर्णय, वित्त विभाग, दि.२०-७-२००१ मधील तरतुदींची पूर्तता केल्यानंतर आश्वासित प्रगती योजनेचा पहिला लाभ व अनुषंगिक सेवाविषयक लाभ अनुज्ञेय ठरतील.

(३) वर नमूद केलेल्या ७ संवर्गातील ज्या कर्मचाऱ्यांचे शासनाच्या दि.२०-५-१९९९ व त्यानंतर वेळोवेळी काढण्यात आलेल्या आदेशांमधील अटींनुसार स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गात समावेशन होईल त्याच कर्मचाऱ्यांना स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाचे लाभ, त्यांचे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गात समावेशन झाल्याच्या दिनांकापासून अनुज्ञेय ठरतील. ज्यांचे समावेशन होणार नाही त्यांच्या बाबतीत त्यांच्या मूळच्या संवर्गातील पद हे रुपांतरित अस्थायी आस्थापना (CRT) वरील असेल व त्याची वेतनश्रेणी स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदाच्या वेतनश्रेणीशी समकक्ष असेल अशाच पदधारकांना यथास्थिती शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.८-६-१९९५, शासन निर्णय, वित्त विभाग, दि.२०-७-२००१ मधील तरतुदींची पूर्तता केल्यानंतर आश्वासित प्रगती योजनेचा पहिला लाभ व अनुषंगिक सेवाविषयक लाभ अनुज्ञेय ठरतील.

(४) ज्या कर्मचाऱ्यांना त्यांच्या मूळ संवर्गात दि.२०-५-१९९९ पूर्वी त्यांच्या मूळ पदानुसार कालबध्द पदोन्नती योजनेचा लाभ मिळालेला आहे, तो त्यांचा पहिला लाभ समजण्यात येईल व अशा कर्मचाऱ्यांपैकी जे कर्मचारी मेस्त्री ग्रेड-१, मेस्त्री ग्रेड-२, समयपाल, रोड कारकून, हजेरी सहायक तसेच, ७ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर वरिष्ठ वेतनश्रेणी न मिळालेले अनुरेखक या संवर्गातील असतील त्यांना स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गात समावेशन झाल्याच्या दिनांकास रु.४०००-

६००० ही वरची वेतनश्रेणी अनुज्ञेय ठरत असल्यामुळे अशा कर्मचाऱ्यांचा दुसऱ्या लाभाकरिताचा कालावधी त्यांच्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गातील समावेशनाच्या दिनांकापासून विचारात घेण्यात यावा व त्यानुसार त्यांची स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गात १२ वर्षे अर्हताकारी सेवा झाल्यानंतर त्यांना शासन निर्णय, वित्त विभाग, दि. १-४-२०१० मधील अटी व शर्तींची पूर्तता केल्यानंतर कनिष्ठ अभियंता पदाची वेतनश्रेणी सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या इतर अटींची पूर्तता होत असल्यास अनुज्ञेय राहील.

(५) कनिष्ठ अभियंता यांचे सहायक या संवर्गातील कर्मचाऱ्यांना त्यांची वेतनश्रेणी स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाच्या वेतनश्रेणीशी समतुल्य असल्यामुळे त्यांना त्यांचे स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक संवर्गात समावेशन होताना वरिष्ठ वेतनश्रेणी मिळत नाही. त्यामुळे कनिष्ठ अभियंता यांचे सहायक या संवर्गातील कर्मचाऱ्यांना त्यांच्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गात समावेशन होण्यापूर्वी म्हणजेच दि. २०-५-१९९९ पूर्वी त्यांना त्यांच्या मूळ पदानुसार त्यांची रुपांतरित अस्थायी आस्थापना (CRT) वर झालेली सेवा विचारात घेऊन कालबध्द पदोन्नती शासन निर्णय सा.प्र.वि. दि.८-६-१९९५ व शासन निर्णय वित्त विभाग दि.२०-७-२००१ मधील तरतूदीनुसार ज्या दिनांकास वरिष्ठ वेतनश्रेणी देय ठरेल त्या तारखेस संबंधितास कालबध्द पदोन्नती आश्वासित प्रगती योजना ( ACPS ) चा प्रथम लाभ मंजूर करावा. पहिला लाभ मंजुरीच्या त्या दिनांकापासून १२ वर्षाची नियमित अर्हताकारी सेवेनंतर शासन निर्णय, वित्त विभाग, दि.१-४-२०१० मधील तरतुदीनुसार विहित अर्हता/पात्रता धारण करीत असल्यास सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गतचा दुसरा लाभ म्हणून कनिष्ठ अभियंता पदाची वेतनश्रेणी अनुज्ञेय ठरेल.

(६) सात वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर ज्या अनुरेखकांना रु.४०००-६००० ही वेतनश्रेणी मिळालेली आहे तो अशा कर्मचाऱ्यांच्या आश्वासित प्रगती योजनेचा पहिला लाभ आहे. अशा अनुरेखक संवर्गातील कर्मचाऱ्यांना स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाच्या वेतनश्रेणीशी समतुल्य असल्यामुळे त्यांना त्यांचे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गात समावेशन होताना वरिष्ठ वेतनश्रेणी मिळत नाही. ७ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर ज्या अनुरेखकांना रु.४०००-६००० ही अकार्यात्मक वेतनश्रेणी मिळालेली आहे, अशा अनुरेखक संवर्गातील कर्मचाऱ्यांची त्यांच्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गात समावेशन होण्यापूर्वी म्हणजेच दि.२०-५-१९९९ पूर्वीची वेतनश्रेणी ही स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या पदाच्या वेतनश्रेणीच्या समकक्ष होती, अशा कर्मचाऱ्यांच्या १२ वर्षाच्या सेवेची गणना करतांना ते स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गात समावेशनापूर्वी, मूळ पदावर रु.४०००-६००० या वेतनश्रेणीत रुपांतरित अस्थायी आस्थापने (CRT) वर ज्या दिनांकास आले, त्या दिनांकापासून पुढील १२ वर्षाची अर्हताकारी सेवा विचारात घेण्यात यावी. त्यांना शासन निर्णय, वित्त विभाग, दि. १-४-२०१० नुसार त्यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती

योजनेंतर्गतचा दुसरा लाभ म्हणून कनिष्ठ अभियंता पदाची वेतनश्रेणी, इतर अटी व शर्ती पूर्ण करीत असतील तर अनुज्ञेय ठरेल.

(७) ज्या कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती अथवा सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत पहिला लाभ म्हणून रु.४०००-६००० ज्या दिनांकाला वेतनश्रेणी मिळालेली आहे त्या दिनांकापासून १२ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर शासन निर्णय, वित्त विभाग, दि.१-४-२०१० मधील तरतुदीनुसार विहित अर्हता/पात्रता धारण करीत असल्यास कनिष्ठ अभियंता पदाची वेतनश्रेणी, सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत अनुज्ञेय ठरेल.

(८) कालबध्द पदोन्नती/सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाचा दि.८-६-१९९५ चा शासन निर्णय आणि वित्त विभागाचे दि.१-४-२०१० आणि दि.५-७-२०१० चे शासन निर्णय तसेच यासंदर्भातील वित्त विभागाचे दि. १-७-२०११ चे स्पष्टीकरण यामधील तरतुदींप्रमाणे तपासणी करुन त्यामधील अटी व शर्तीची (उदा. विभागीय परीक्षा, अर्हता परीक्षा उत्तीर्ण होणे, पदोन्नतीच्या पदासाठीची आवश्यक पात्रता धारण करणे, मागास प्रवर्गातील कर्मचाऱ्यांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर करणे, गोपनीय अहवालाची प्रतवारी पदोन्नतीच्या पदाकरिता ठरविलेल्या प्रतवारीनुसार असणे, सेवाप्रवेश नियमातील तरतुदींची पूर्तता विभागीय चौकशी व न्यायिक प्रकरणच्या स्थितीनुसार शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दि.२-४-१९७६ नुसार कार्यवाही करणे, इत्यादि पूर्तता होत असेल तरच या योजनेंतर्गतचे लाभ अनुज्ञेय ठरतील.

दिनांक २३.८.२०१० च्या परित्रकाव्दारे वयाच्या ४५ वर्षानंतर कनिष्ठ अभियंता पदाची व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गातील कर्मचाऱ्यांना सूट देण्यात आलेली आहे. वरिष्ठ वेतनश्रेणी देतांना सदर बाब विचारात घ्यावी. तसेच स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गात समावेशन झालेल्या कर्मचाऱ्यांना समावेशनाच्या दिनांकापासून (ज्यांची समावेशनाच्या दिनांकास अथवा तत्पूर्वी वयाची ४५ वर्षे पूर्ण झाली आहेत त्यांच्या बाबतीत ) अथवा त्यांची वयाची ४५ वर्षे पूर्ण झालेल्या दिनांकापासून यापैकी जो नंतरचा दिनांक असेल त्या दिनांकापासून अनुज्ञेय ठरतील.

(९) कालबध्द पदोन्नती योजना/सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना/सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ अनुज्ञेय करतांना त्यामधील अटी व शर्तीच्या अनुषंगाने तपासणी न करताच लाभ अनुज्ञेय केलेल्या/करणाऱ्या संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यांवर विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी जबाबदारी निश्चित करावी.

(१०) स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांना ज्या दिनांकाला कालबध्द पदोन्नती/ सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना/ सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत वरिष्ठ वेतनश्रेणी देय होईल त्या

दिनांकापासूनच्या परिच्छेद ८ येथील निर्णयातील तरतुदीनुसार वेतन फरकाची रक्कम त्यांना देय राहील.

(११) या परिपत्रकाशी संबंधित असणाऱ्या पदांचे पाचवा वेतन आयोग तसेच सहावा वेतन आयोग यामधील वेतन संरचना दर्शविणारे प्रपत्र सोबत जोडले आहे.

४. वर नमूद केलेल्या सूचना विचारात घेऊन स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांना कालबध्द पदोन्नती/सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना/सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्याबाबत काटेकोरपणे कार्यवाही करण्यात यावी. तसेच यापूर्वी ज्या कर्मचाऱ्यांना कनिष्ठ अभियंता पदाची वेतनश्रेणी देण्यासंदर्भात कार्यवाही झालेली आहे त्या प्रकरणांची उपरोक्त सूचनांनुसार पुनर्तपासणी करावी व ज्या कर्मचाऱ्यांना अतिप्रदान झाले असल्याचे आढळून येईल त्यांची वसुली करण्याची कार्यवाही करावी.

५. हे परिपत्रक वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५२०, दि.६.११.२०१३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२४१७३७२८९२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Eknath Kulkarni

Digitally signed by Anil Eknath Kulkarni
DN: CN = Anil Eknath Kulkarni, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Reason: I am approving this document
Date: 2014.07.31 15:37:19 +05'30'

(अ.ए.कुलकर्णी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.मंत्री,ग्राम विकास यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई-३२.
२) मा.राज्यमंत्री,ग्राम विकास यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई-३२
३) मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
४) सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/संचिव यांचे स्वीय सहाय्यक.
५) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
८) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,
९) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,ग्राम विकास व जलसंधारण विभाग मंत्रालय मुंबई-३२.
१०) निवड नस्ती, आस्था-१०. बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१.

प्र-पत्र

स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गात समावेशनासाठी संमत करण्यात आलेल्यासंवर्गातील पदांची ५ वा वेतन आयोग तसेच ६ वा वेतन आयोगानुसार मंजूर असलेली वेतन संरचना.

| अ.क्र. | पदाचे नांव | वेतनश्रेणी पाचवा वेतन आयोग १-१-१९९६ | वेतन संरचना सहावा वेतन आयोग १-१-२००६ |
|---|---|---|---|
| | शाखा अभियंता | ६५००-१०५०० | ९३००.३४८०० ग्रे.वे.४४०० |
| | कनिष्ठ अभियंता | ५५००-९००० | ९३००.३४८०० ग्रे.वे.४३०० |
| | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक (कनिष्ठ अभियंता यांचे सहायक) | ४०००-६००० | ५२००-२०२०० ग्रे.वे.२४०० |
| | मेस्त्री ग्रेड-१ | ३०५०-४५९०+ वि.वे.रु.१५०/- | ५२००-२०२०० ग्रे.वे.२००० |
| | मेस्त्री ग्रेड-२ | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० ग्रे.वे.१९०० |
| | समयपाल | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० ग्रे.वे.१९०० |
| | रोड कारकून | ३०५०-४५९० | ५४००-२०२०० ग्रे.वे.१९०० |
| | हजेरीपट लिपिक | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० ग्रे.वे.१९०० |
| | अनुरेखक | ३२००-४९०० ४०००-६००० (७ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) | ५२००-२०२०० ग्रे.वे.२००० ५२००-२०२०० ग्रे.वे.२४०० (७ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) |

*************

